**माजी खंडकरी अथवा त्यांच्या कायदेशीर वारसांना वाटप करण्यात आलेले क्षेत्र बदलून देण्याची विनंती करण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक :- मशेम २०१६/प्र.क्र.४१/ल-७
मंत्रालय, मुंबई :- ४०००३२
दिनांक :- ०३ डिसेंबर, २०१६

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र शेतजमीन (जमीन धारणेची कमाल मर्यादा) अधिनियम, १९६१ च्या कलम २८-१ अ अ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाच्या ताब्यातील जमिनीतून अनुज्ञेय क्षेत्राचे पात्र माजी खंडकरी शेतकरी व त्यांच्या कायदेशीर वारसांना वाटप करण्यात येत आहे. सदर अनुज्ञेय क्षेत्र वाटप करण्यासाठी शासन परिपत्रक क्र. आयसीएच-३४९८/ प्र.क्र.२३/ भाग-जी/ ल-७ दिनांक ४.०५.२०१२ अन्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि, माजी खंडकरी अथवा त्यांच्या कायदेशीर वारसांना वाटप करण्यात आलेले क्षेत्र हे शेती करण्यास अयोग्य/नापीक असल्याच्या कारणास्तव सदरचे क्षेत्र बदलून देण्याबाबतच्या विनंत्या शासनास तसेच संबधित जिल्हाधिकारी कार्यालयास प्राप्त होतात. या पार्श्वभूमीवर सदरचे क्षेत्र बदलून देण्याबाबत विनंती करण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याबाबतच्या सूचना देण्यात येत आहेत.

" माजी खंडकरी शेतकरी किंवा त्यांच्या कायदेशीर वारस यास एखाद्या मळयात वाटप करण्यात आलेल्या क्षेत्राऐवजी अन्य जमीन वाटप करण्याची मागणी असल्यास, अशा अर्जदारास वाटप केलेल्या क्षेत्राची संबंधित जिल्हाधिकारी यांनी जिल्हा कृषी अधिकारी यांच्या समवेत संयुक्तपणे स्थळ पाहणी करुन, सदरची जमीन नापीक व शेतीस अयोग्य असल्याची खात्री करावी. तशी खात्री झाल्यास त्याच मळयात वाटपासाठी क्षेत्र उपलब्ध असल्यास " महाराष्ट्र जनरल क्लॉजेस ॲक्टच्या कलम २१ " च्या तरतुदीचा वापर करुन महाराष्ट्र शेतजमीन (जमीन धारणेची कमाल मर्यादा) अधिनियम, १९६१ च्या कलम २८-१ अ अ मधील तरतुदी अंतर्गत सुधारीत वाटपाचे आदेश त्यांच्या स्तरावर काढावेत. मात्र संबंधित मळयात पर्यायी क्षेत्र वाटपास उपलब्ध नसल्यास जिल्हाधिकारी यांनी गुणवत्तेवर प्रकरण तपासून क्षेत्र बदलून देणेबाबतचा व कोणती जमीन द्यावयाची याबाबत सुस्पष्ट प्रस्ताव महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाकडे पाठवावा. त्यानुसार व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ, पुणे यांनी क्षेत्र बदलून देण्याबाबत विचार करावा. जिल्हाधिकारी व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ यांचे एखाद्या प्रकरणामध्ये एकमत झाले नाही, तर त्याबाबत विभागीय आयुक्त यांनी गुणवत्तेवर अंतिम निर्णय त्यांच्या स्तरावर घ्यावा."

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१६२०१०८११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Jagannath Patil

Digitally signed by Sanjay Jagannath Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0aef67f1b466cda14a91421532b9a0945726bfe27ade33f9f8e47372fba0cab4, cn=Sanjay Jagannath Patil
Date: 2016.12.03 16:26:42 +05'30'

**(संजय पाटील)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा. मंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. राज्यमंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. प्रधान सचिव, महसूल, मंत्रालय, मुंबई-३२
५. विभागीय आयुक्त, पुणे/नाशिक/औरंगाबाद विभाग
६. जिल्हाधिकारी, पुणे/सातारा/कोल्हापूर/सोलापूर/नाशिक/अहदमनगर/औरंगाबाद
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ, पुणे
८. उपजिल्हाधिकारी (भुसूधार), पुणे/सातारा/ कोल्हापूर/ सोलापूर/ नाशिक/ अहमदनगर/ औरंगाबाद
९. निवडनस्ती ल-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२